# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक- पोप्रमा-०११७/प्र.क्र.६५/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : ३० मार्च, २०१७.

**विषय** :- पोलीस ठाणे, आचरा, ता. मालवण, जि. सिंधुदुर्ग येथे जमीन भरणा करणे व कुंपण भिंत बांधणे यांकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ उंची-वाढवणे-व-कंपाऊड-वॉल-बांध.-सिंधुदुर्ग/ ३४७/ २०१६, दिनांक ०४.०१.२०१७.

**ज्ञापन :-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी पोलीस ठाणे, आचरा, ता. मालवण, जि. सिंधुदूर्ग येथे जमीन भरणा करणे व कुंपण भिंत बांधणे यांबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी, उप-विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप-विभाग क्र.१, कणकवली, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.६०,२४,४९६/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत. हे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुडाळ, कणकवली यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते **रु.६२,५४,००१/-** असे सुधारले आहेत आणि प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

४. त्या अनुसार, पोलीस ठाणे, आचरा, ता. मालवण, जि. सिंधुदुर्ग येथे जमीन भरणा करणे व कुंपण भिंत बांधणेसाठी **रु.६२,५४,००१/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१७२/इमा-२, दिनांक ०९.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१७०४०३१७३८२२४४२९ असा आहे. हे ज्ञापन डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.04.03 17:39:33 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोकण परिक्षेत्र, नवी मुंबई.
४) पोलीस अधीक्षक, सिंधुदुर्ग.
५) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कुडाळ, कणकवली, जि. सिंधुदुर्ग.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
८) निवड फाईल (पोल-७).